**"मृद सर्वेक्षण आणि अन्वेषण व मृद विश्लेषण रसायन प्रयोगशाळा या योजनेतील अस्थायी पदे दि.०१.१०.२०१९ पासून दि. २९.०२.२०२० पर्यंत पुढे चालू ठेवण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः मृदस १४१९/प्र.क्र.५५/१७-अे**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, विस्तार, मुंबई - ४०० ०३२
दिनांक: ०९.१०.२०१९

वाचा :

१. वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक: पदनि २०१६/ प्र.क्र. ८/१६/ आ.पु.क., दि. २१/०२/२०१९
२. कृषि व पदुम विभाग, शासन निर्णय क्रमांक: मृदस १४१९/प्र.क्र. ५५/१७-अे, दि. ०५.०३.२०१९
३. वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक: पदनि २०१६/ प्र.क्र. ८/१६/ आ.पु.क., दि. ११/०९/२०१९
४. कृषि आयुक्तालयाचे पत्र जा.क्र. योचाप्र/मृचाप्र/२०१९-२०/आस्थापना-५ (निप)/ १९९०, दि. १९/०९/२०१९

प्रस्तावना-

मृद सर्वेक्षण आणि अन्वेषण व मृद विश्लेषण रसायन प्रयोगशाळा या योजनेतील ३७७ मंजूर पदांपैकी २२२ स्थायी पदे वगळता उर्वरीत १५५ अस्थायी पदे दिनांक ३०/०९/२०१९ पर्यंत चालू ठेवण्यास या विभागाच्या संदर्भ क्र. २ येथील दिनांक ०५/०३/२०१९ च्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आलेली होती. आता, संदर्भ क्र. ३ येथील शासन निर्णयान्वये वित्त विभागाने निर्गमित केलेल्या आदेशानुसार सदर अस्थायी पदे दिनांक ०१/१०/२०१९ पासून दिनांक २९/०२/२०२० पर्यंत या कालावधीत पुढे चालू ठेवण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय:

मृद सर्वेक्षण आणि अन्वेषण व मृद विश्लेषण रसायन प्रयोगशाळा या योजनेतील ३७७ मंजूर पदांपैकी २२२ स्थायी पदे वगळता उर्वरीत १५५ अस्थायी पदे आकृतीबंधात समाविष्ट असल्याचे अधीन राहून दि.०१/१०/२०१९ ते दि. २९ /०२ /२०२० पर्यंत पुढे चालू ठेवण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे. (सोबत विवरणपत्र जोडले आहे.)

या प्रित्यर्थ होणारा खर्च सन २०१९-२० करीता मंजूर असलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा. सदर खर्च खालील लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा

**मागणी क्र. डी -३**
२४०२, मृद व जलसंधारण
१०१, मृद सर्वेक्षण व चाचणी
(००) (०२) मृद सर्वेक्षण आणि अन्वेषण व मृद विश्लेषण रसायन प्रयोगशाळा
(२४०२ ००३२)

हे आदेश वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र. पदनि २०१६ / प्र.क्र. ८/ १६ / आ.पु.क. दि. ११. ०९. २०१९ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार व सचिव (कृषी ) यांच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९१०१०१०५९२२७५०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Prakash Rawoo Kadam

Digitally signed by Prakash Rawoo Kadam
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Agriculture and ADF Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=944e446a6b36b86a52f12def26aa74e1d37e67433a0ce27e6a2caf774b9795c6, cn=Prakash Rawoo Kadam
Date: 2019.10.10 11:03:55 +05'30'

**( प्रकाश रा. कदम )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत:-**
१) आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
२) महालेखापाल, महाराष्ट्र १/२ (लेखा परिक्षा/ लेखा व अनुज्ञेयता) मुंबई / नागपूर.
३) कृषि संचालक (निवगुनि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
४) कृषि सहसंचालक (आस्थापना), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
५) सर्व विभागीय कृषि सहसंचालक
६) सर्व जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी
७) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
८) उप संचालक (मृद सर्वेक्षण व मृद चाचणी), कृषि आयुक्तालय, पुणे
९) प्रशासन अधिकारी, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
१०) सर्व जिल्हा शासकीय मृद सर्वेक्षण व मृद चाचणी प्रयोगशाळा
११) वित्त विभाग (वित्तीय सुधारणा), मंत्रालय, मुंबई
१२) कार्यासन (२-अे), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई
१३) निवडनस्ती.

**शासन निर्णय कृषि व पदुम विभाग मृदस १४१९/ प्र.क्र. ५५ /१७अे**
**दि. ०९.१०.२०१९ चे सहपत्र.**

**विवरण पत्र**

| **अ.क्र.** | **पदनाम** | **पदसंख्या** |
|---|---|---|
| १ | मृद सर्वेक्षण व मृद चाचणी अधिकारी | २३ |
| २ | कृषि पर्यवेक्षक | १८ |
| ३ | कृषि सहाय्यक | २० |
| ४ | वरिष्ठ लिपिक | २३ |
| ५ | लिपीक | १५ |
| ६ | अनुरेखक | ० |
| ७ | वाहन चालक | २२ |
| ८ | शिपाई | ३४ |
| | **एकूण** | **१५५** |